# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- पोप्रमा-०११७/प्र.क्र.६४/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- सोलापूर शहरातील पोलीस वसाहतींमधील निवासस्थानांची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक ०४.०१.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, सोलापूर, यांनी सोलापूर शहरातील पोलीस वसाहतींमधील निवासस्थानांची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, उत्तर सोलापूर, यांनी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.३,३२,७४,७९०/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर करण्यात आले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद केलेल्या कामांकरिता स्तंभ (३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे खर्चाचे अंदाज सुधारित करुन दिलेले आहेत.

| अ.क्र.<br>(१) | कामाचे नाव<br>(२) | खर्चाचे अंदाज<br>(३) |
|---|---|---|
| १. | वसंतनगर पोलीस वसाहतीमधील दुरुस्तीची कामे. | रु.११,७८,३८९/- |
| २. | अरविंदधाम पोलीस वसाहतीतील दुरुस्तीची कामे. | रु.१६,७५,४३१/- |
| ३. | मंत्रिचंडक पोलीस वसाहतीतील दुरुस्तीची कामे. | रु.१३,९०,००८/- |
| **एकूण** | | **रु.४२,४३,८२८/-** |

४. परिच्छेद ३ मधील तक्त्यात नमूद केलेल्या खर्चाच्या अंदाजांनुसार प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिली आहे. त्या अनुसार, सोलापूर शहरातील परिच्छेद ३ मधील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद केलेल्या दुरुस्तीची कामे

करण्याकरिता उक्त तक्त्यातील स्तंभ (३) मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण **रु.४२,४३,८२८/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१६/इमा-२, दिनांक २२.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१७५६११३५२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 17:57:53 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, सोलापूर शहर, सोलापूर.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, सोलापूर.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, सोलापूर.
८) निवड फाईल (पोल-७).